**माझी वसुंधरा अभियानांतर्गत प्राप्त बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
**संगमनेर नगरपरिषद**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय**, क्रमांक अभियान २०२२/ प्र.क्र.५७ /तां.क.१
शहीद भगतसिंग चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: ५ मे, २०२२

वाचा : (१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२१/ प्र.क्र.५७/ तां.क.१, दिनांक ८ जुलै, २०२१
(२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२१/ प्र.क्र.५७/ तां.क.१, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२२
(३) प्रशासकीय मान्यता देण्यासाठी गठित समितीच्या दिनांक ३ मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इत्तिवृत्त.

**प्रस्तावना :**

माझी वसुंधरा अभियान १.० मधील ४ गटातील विजेत्यांचा सन्मान दिनांक ५ जून, २०२१ रोजी करण्यात आला असून, या विजेत्या स्थानिक संस्थांना रोख रकमांची पारितोषीके व सदर बक्षिस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती संदर्भीय क्रमांक (१) येथील दिनांक ८ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली आहे. त्यानुसार, स्थानिक संस्थांनी पारितोषीकाच्या रकमेमधून हाती घ्यावयाचा कामांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून, त्यास संदर्भीय क्रमांक (२) येथील दिनांक ८ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल यांच्या अध्यक्षतेखाली गठित समितीकडून प्रशासकीय मान्यता घ्यावयाची आहे.

२. त्यानुसार, बक्षिस मिळालेल्या स्थानिक संस्थांकडून प्राप्त झालेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास मान्यता देण्यासाठी मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३ मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत १० स्थानिक संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालावर चर्चा होवून समितीने केलेल्या शिफारशीनुसार संबंधित

स्थानिक संस्थेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून माझी वसुंधरा अभियानांतर्गत स्थानिक संस्थांना प्राप्त होणाऱ्या बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामाचा रू. ०.५० कोटी किमतीचा सविस्तर प्रकल्प अहवाल मुख्याधिकारी, **संगमनेर नगरपरिषद** यांनी शहर अभियंता, **अहमदनगर महानगरपालिका** यांची तांत्रिक मान्यता घेवून सादर केला आहे. मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीच्या दिनांक ३ मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार, **संगमनेर नगरपरिषदेने** सादर केलेल्या रू ०.५० कोटी किंमतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालातील रू १७,५६,६८९ किंमतीची खाली नमूद केलेली कामे वगळता उर्वरित रू. ३२,४३,११८/- कोटी किंमतीच्या कामांना (या शासन निर्णया सोबतच्या ***जोडपत्र-१*** मध्ये दर्शविल्या प्रमाणे) खालील परिच्छेद ३ मध्ये नमूद अटी व शर्तींच्या अधिन शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

(१) हेरिटेज वृक्षांचे संवर्धन :- रू.७,८१,६८९/- (ज्यामध्ये मुख्यत: बांधकामांचा समावेश केला आहे उदा. वृक्ष पार बांधणे, माहिती फलक लावणे इत्यादी कामाचा समावेश आहे.)

(२) एअर क्वालिटी मॉनिटरींग बोर्ड विकत घेणे. **खर्च: रू.९,७५,०००/-**

२. **सविस्तर प्रकल्प अहवालातील उपरोक्त प्रशासकीय मान्यते मधून वगळलेल्या कामांवरील** रक्कम रू.१७,५६,६८९/- संगमनेर नगरपरिषदेने शहराचे हरित आच्छादन वाढविण्याकरीता वापरणे आवश्यक आहे. त्यानुसार, **सदर रकमेचा सुधारित सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून त्यास संबंधित शहर अभियंत्याची तांत्रिक मंजूरी घेवून स्थानिक संस्थेच्यास्तरावर अंमलबजावणी करण्यास समितीने मान्यता दिली आहे.**

३. माझी वसुंधरा अभियानांतर्गत **संगमनेर नगरपरिषद** यांना **नगर परिषद** गटातील उच्चत्तम कामगिरीच्या आधारे रू ०.५० कोटी रक्कमेचे बक्षिस जाहिर करण्यात आले आहे. या

बक्षिस रकमेपैकी रू. ०.२५ कोटी रकमेचा पहिला हप्ता त्यांना वितरीत करण्यात आला आहे. सदर बक्षिस रकमेमधून घ्यावयाच्या कामांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास उपरोक्त प्रमाणे शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली असल्याने **संगमनेर नगरपरिषदेस** बक्षिस रकमेचा रू. ०.२५ कोटी रकमेचा **दुसरा हप्ता** महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळा मार्फत वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

४. **अटी व शर्ती :**

१) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांसाठी कार्यान्वयन यंत्रणा संगमनेर नगर परिषद राहील.

२) सविस्तर प्रकल्प अहवालातील उपरोक्त प्रशासकीय मान्यते मधून वगळलेल्या कामांवरील रक्कम रू.१७,५६,६८९/- शहराचे हरित अच्छादन वाढविण्यसाठी वापरण्यात यावी. त्यासाठी सदर रकमेचा सुधारित सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून त्यास संबंधित शहर अभियंत्याची तांत्रिक मंजूरी घेवून स्थानिक संस्थेच्यास्तरावर अंमलबजावणी करावी.

३) सदर सविस्तर प्रकल्प अहवाला मधील कामांच्या अंमलबजावणीचा आर्थीक व भौतिक प्रगती अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माझी वसुंधरा अभियान संचालनालयास पाठविण्यात यावा.

४) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांची अंमलबजावणी प्रशासकीय मान्यता मिळाल्या पासून पुढील ६ महिन्यात पूर्ण करावी.

५) बक्षिस रकमेपेक्षा अधिकचा खर्च झाल्यास तो स्वनिधी मधून करण्यात यावा.

६) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही करणास्तव वाढ झाल्यास त्यासाठी कोणताही वाढीव निधी / अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०२२०५०५१७४४३११७०४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDIP S KAMBLE

Digitally signed by SANDIP S KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d7be2b5d92ced254370f6b4a45426167ed60f51dcb34812d7d246c9a9c8557c, pseudonym=79EA9C474F7D4F5206B9ED0C363B11911F0A3D59, serialNumber=1E6E3F448F34D1DD3C4B0B04F8D07D573564E9568C0F01BBF302B61CD08D36F2, cn=SANDIP S KAMBLE
Date: 2022.05.05 17:45:34 +05'30'

**( संदिप कांबळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
४. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
६. जिल्हाधिकारी. अहमदनगर
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
८. मुख्याधिकारी, संगमनेर नगरपरिषद
९. निवडनस्ती

## जोडपत्र-१

शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक अभियान २०२२/ प्र.क्र.५७ /तां.क.१ दिनांक ५ मे, २०२२ चे सहपत्र.

| Sr No | Name of the Activity | Expenditure (In Rs) |
|---|---|---|
| A | Green Cover, biodiversity etc. – Approx. ५०% of prize Money | |
| १ | Proposed plant nursery expansion at existing Nehru Garden | ३,९४,४९४.०० |
| २ | Proposed Horticulture Works @Indira Garden Premises (Bhumapan Number १४२), Sangamner Nagarparishad, Sangamner | ४,८४,०७४.०० |
| ३ | Proposed Horticulture Works @Sant Tukaram Garden Premises, Sangamner Nagarparishad, Sangamner | १,८०,३०३.०० |
| ४ | Proposed Horticulture Works @Sayajirao Garden Premises, Sangamner Nagarparishad, Sangamner. | ४,८८,३४२.०० |
| ५ | Proposed Horticulture Works @Beti Bachav Garden Premises (S.N.१३३), Sangamner Nagarparishad, Sangamner. | २,०२,९८३.०० |
| | Total (१+२+३+४+५+६) | १७,५०,१६६.०० |
| B | Other Components of MVA Components – Approx. ५०% of prize Money | |
| ६ | Proposed Ambient Air Quality Monitoring System to be measured @ ३ Locations of Sangamner City for १० months | २,६५,५००.०० |
| ७ | Proposed Integrated Solar Street Lights @Sangamner Gardens, Sangamner Nagarparishad, Sangamner | ५,०७,८८२.०० |

| Sr No | Name of the Activity | Expenditure (In Rs) |
|---|---|---|
| ८ | Proposed २-Wheeler, ३-Wheeler & ४-Wheeler Chargers for Electric Vehicles @Sangamner Nagarparishad Campus, Sangamner. | ३,०८,६४१.०० |
| ९ | Proposed Panchamahabhuta Sculpture @Shivaji Nagar Chouk, Sangamner | १,६०,९२९.०० |
| १० | Proposed Action plan for Local Competitions to promote MVA (१०% of part two prize money i.e., Rs. २५ lakhs) | २,५०,०००.०० |
| | **Total (६+७+८+९+१०)** | **१४,९२,९५२.००** |
| | **Grant Total (A + B)** | **३२,४३,११८.००** |